**केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सर्वसाधारण योजनेकरिता सन २०२५-२६ च्या राज्यशासनाच्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना माहे एप्रिल, २०२५ चे मानधन रु.८४१८.८६ लक्ष इतकी रक्कम वितरीत करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः आशा-५६२४ /प्र.क्र.२५१/एनएचएम(ई. संगणक क्र. ११०५३३८)**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २८ मे, २०२५

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५ /प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७.०४.२०२५.
२) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.आशा-५६२३/प्र.क्र.५३५/आरोग्य-७, दिनांक १४/०३/२०२४
३) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.आशा-५६२३/प्र.क्र.५३५/आरोग्य-७, दिनांक २०/०९/२०२४
४) सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआअ/राज्य शासन-निधी/माहे एप्रिल-२०२५ /प्रस्ताव/७७६२-६६/२५, दिनांक २४/०४/२०२५.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रमांतर्गत राज्यात आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक कार्यरत आहेत. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना, निकष व दराप्रमाणे राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत प्रकल्प अंमलबजावणी आराखडयात मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना राष्ट्रीय आरोग्य अभियानात नेमून दिलेल्या सेवांकरिता केंद्र शासनाने निर्धारित केल्याप्रमाणे प्रोत्साहनात्मक मोबदला दिला जातो. तथापि, राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रम व इतर राष्ट्रीय आरोग्य विषयक कार्यक्रमाच्या अंमलबजावणीत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक हया दोन्ही घटकांच्या भूमिका महत्वाच्या असल्यामुळे सदर कामांकरीता त्यांना दिनांक १४.०३.२०२४ च्या व दिनांक २०.०९.२०२४ च्या शासन निर्णयान्वये आशा स्वयंसेविका व गटप्रर्वतक यांच्या मानधनात वाढ करुन अनुक्रमे रु. १००००/- व रु. ११२००/- इतका मोबदला देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात रु.

३२८६८.०० लक्ष इतके अनुदान राज्य शासनाकडून मंजूर झाले असून माहे एप्रिल २०२५ चे रु. ८४१८.८६ लक्ष व नागपूर व गडचिरोली या जिल्हयांसाठी तसेच लातुर महानगरपालिकेसाठी माहे मार्च, २०२५ चे रु. ४४१.९७ लक्ष असे एकूण रु. ८८६०.८४ लक्ष इतका मानधनाचा निधी वितरीत करण्यास मंजुरी देण्याबाबत वित्त व नियोजन विभागास विनंती करण्यात आली होती. त्यानुषंगाने वित्त व नियोजन विभागाने आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांचे माहे एप्रिल २०२५ चे मानधन अदा करण्यासाठी रु. ८४१८.८६ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे. त्या अनुषंगाने रु रु. ८४१८.८६ लक्ष इतके अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना मोबदला अदा करण्यासाठी सन २०२५-२६ मध्ये रु. ३२८६८.०० लक्ष इतकी तरतूद राज्यशासनाने अर्थसंकल्पीत केलेली आहे. सदर तरतुदीतून आशा स्वयंसेविका व आशा गटप्रवर्तक यांना माहे एप्रिल २०२५ चे रु. ८४१८.८६ लक्ष इतका निधी लेखाशिर्ष २२१०H०१५, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) मधून वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२५-२६ साठी मंजूर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ. क्र. | तपशिल | | | (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पिय तरतुद सन २०२५-२६ | वितरीत करावयाची रक्कम (राज्य हिस्सा) |
| १ | आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; १०१-रोग प्रतिबंध आणि नियंत्रण | २२१०H०१५ | ३२८६८.०० | ८४१८.८६ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | ०२-किमान गरजा कार्यक्रम<br>(०२) (०१) आशा स्वयंसेविका व आशा गटप्रवर्तक यांना प्रोत्साहन (कार्यक्रम)<br>३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | | | |

४. वित्त विभागाच्या दिनांक ०७ एप्रिल, २०२५ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.८ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक ०७ एप्रिल, २०२५ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/ विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

६. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत.

७. सदर अनुदान बिनशर्त आहे.

८. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १६१/२०२५/का.१४७२, दिनांक ०९/०५/२०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३९०/२०२५/व्यय-१३ दिनांक १६/०५/२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२८१६५५०७४५१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL SAWARE

Digitally signed by ANIL SAWARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=073348b7a8767f0f7865422df1e65ce2f3bcdf6786e4712e2c088a9ac4ffee3f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1C7875BFBCCDB94828A5028954F06ED28EC75FD43053DB3AE8254FA5A5D14A57, cn=ANIL SAWARE
Date: 2025.05.28 17:06:15 +05'30'

**(अनिल वि. सावरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.

२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अतिरिक्त संचालक, कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग(का-१४७२), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग ( अर्थसंकल्प)/व्यय-१३, मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१२.निवडनस्ती ( एनएचएम) .